**एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठाच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त चर्चगेट आवारातील प्रवेशद्वार व अतिथीगृह नूतनीकरणाच्या कामास निधी वितरीत करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएम-१२१६/प्र.क्र.११०/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १८ मे, २०२२.

वाचा:- विभागाचा समक्रमांकाचा दि.१५.१२.२०१८ रोजीचा शासन निर्णय.

प्रस्तावना :

एस.एन.डी.टी.महिला विद्यापीठाचे शतक महोत्सवी वर्षामध्ये पदार्पण होऊन १०१ वे वर्ष सुरु झाले आहे. ही केवळ या देशातील महिलांसाठीच नव्हे तर अखंड भारत वर्षासाठी अत्यंत अभिमानाची बाब आहे. सन १९१६ पासून कोट्यवधी महिलांना सुशिक्षित आणि उच्च शिक्षित करण्याचे काम या विद्यापीठातून होत आहे. एस.एन.डी.टी.महिला विद्यापीठाचे मुख्यालय चर्चगेट, मुंबई येथे असून, सदर मुख्यालयात पदवीदान समारंभासारखे मोठ मोठे कार्यक्रम आयोजित केले जातात. सदर समारंभात मा.राज्यपाल, विद्यापीठाचे कुलपती म्हणून अध्यक्षस्थान भूषवितात. विद्यापीठाच्या विविध कार्यालयीन कामानिमित्त इतर विविध भागातून अतिथी येतात. तसेच परीक्षा विभागातील कार्यालयीन कामकाजासाठी शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी सातत्याने येत असतात. याशिवाय विविध विद्यापीठ स्तरावर निवड समित्यांच्या वेळेस विषयतज्ञ येतात. त्यासाठी विद्यापीठास सर्व सुविधायुक्त अतिथीगृहाची आवश्यकता आहे. एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठाचे चर्चगेट आवारात अतिथीगृह असून सदर अतिथीगृहाचे नूतनीकरण करण्याची आवश्यकता आहे. तद्नुषंगाने विद्यापीठाच्या चर्चगेट आवारातील प्रवेशद्वार व अतिथीगृह नूतनीकरणाचा प्रस्ताव एस.एन.टी.टी.विद्यापीठाने शासनास पाठविला होता. त्यास अनुसरुनस वाचा येथील दि.१५.१२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता सदर कामास निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय:

एस.एन.डी.टी.विद्यापीठ, मुंबई या विद्यापीठाच्या शतक महोत्सवी वर्षानिमित्ताने चर्चगेट आवारातील प्रवेशद्वार व अतिथीगृह नूतनीकरणाच्या कामाकरिता अर्थसंकल्पित असलेल्या निधीतुन **रु.३६,३५,९३८/- (छत्तीस लक्ष पस्तीस हजार नऊशे अडतीस रुपये फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू मंजूर झालेला निधी श्रीमती नाथीबाई दामोधर ठाकरसी विद्यापीठ, मुंबई यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता संबंधीत विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. संबंधीत विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच विद्यापीठाने केलेल्या बांधकामाची सद्य:स्थिती संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास तात्काळ सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. या कामासाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-२, मुख्य लेखाशीर्ष २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२-विद्यापीठांना सहाय्य, (००) (३२) श्रीमती नाथीबाई दामोधर ठाकरसी विद्यापीठ, मुंबई यांचा विकास (२२०२ I ५८६), ३१ अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२२, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ अन्वये विभागास अधिकार प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. हा शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने (वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५०१/२०२२/व्यय-५, दि.०६.०५.२०२२) निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०५१८११२५००१९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2022.05.18 11:27:12 +05'30'

**(प्रताप.पां.लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कुलगुरु, एस.एन.डी.टी.विद्यापीठ, मुंबई.
६) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९) सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) कुलसचिव, एस.एन.डी.टी.विद्यापीठ, मुंबई.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१३) वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८/१२) मंत्रालय, मुंबई.
१४) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.